**संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय कार्यालयातील अस्थायी पदांना दिनांक १ मार्च, २०२२ ते दिनांक ३१ ऑगस्ट, २०२२ पर्यंत पुढे चालू ठेवण्यासाठी मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्र. सांकास १११९ (१५) /प्र. क्र. ८६/सां.का.४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ४ एप्रिल, २०२२

वाचा :- १) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आपुक, दिनांक २२ फेब्रुवारी, २०२२
२) संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांचे पत्र क्र. सां.का.सं/आस्था/२२/५८८, दिनांक ७ मार्च, २०२२

**प्रस्तावना :-**

वित्त विभागाच्या उपर्निर्दिष्ट क्र. १ येथील शासन निर्णयान्वये दिनांक १ मार्च, २०२२ ते दिनांक ३१ ऑगस्ट, २०२२ या कालावधीसाठी अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना देण्यात आले आहेत. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांच्या उपर्निर्दिष्ट क्र. २ येथील पत्रान्वये पाठविण्यात आलेल्या प्रस्तावांच्या अनुषंगाने अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई या कार्यालयाच्या आस्थापनेवरील खालील एकूण १६ अस्थायी पदे दिनांक १ मार्च, २०२२ ते दिनांक ३१ ऑगस्ट, २०२२ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

| अ. क्र. | पदनाम | मंजूर अस्थायी पदांची संख्या | वेतन स्तर | सुधारीत वेतन |
|---|---|---|---|---|
| १ | सहाय्यक लेखा परीक्षा अधिकारी | १ | एस - १५ | ४१८०० - १३२३०० |
| २ | सहाय्यक लेखा अधिकारी | १ | एस - १५ | ४१८० - १३२३०० |
| ३ | सहाय्यक | २ | एस - ८ | २५५०० - ८११०० |
| ४ | लिपिक टंकलेखक | १ | एस - ६ | १९९०० - ६३२०० |
| ५ | वाहन चालक | १ | एस - ६ | १९९०० - ६३२०० |
| ६ | वीजतंत्री | १ | एस - ८ | २५५०० - ८११०० |
| ७ | सहायक ध्वनी तंत्रज्ञ | १ | एस - ६ | १९९०० - ६३२०० |
| ८ | शिपाई | ३ | एस - १ | १५००० - ४७६०० |
| ९ | रंगमंच सहायक | १ | एस - १ | १६६०० - ५२४०० |
| १० | चौकीदार | २ | एस - १ | १५००० - ४७६०० |
| ११ | माळी | १ | एस - १ | १५००० - ४७६०० |
| १२ | सफाईदार | १ | एस - १ | १५००० - ४७६०० |
| | एकूण | १६ | | |

३. उपरोक्त तक्त्यात नमूद केलेली अस्थायी पदे खालील अटींच्या अधीन राहून दिनांक १ मार्च, २०२२ ते दिनांक ३१ ऑगस्ट, २०२२ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे.

अटी :-

१. ज्या प्रयोजनार्थ ही पदे निर्माण केली आहेत, त्याच प्रयोजनार्थ त्या पदांचा विनियोग करण्यात यावा.
२. पदांपैकी कोणतेही पद सहा महिन्यांपेक्षा जास्त कालावधीसाठी रिक्त नसावे.
३. या पदावरील अपेक्षित खर्च मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. यासाठी होणारा खर्च सन २०२२-२०२३ या वित्तीय वर्षासाठी मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा आणि तो खालील नमूद केलेल्या लेखाशीर्षातून खर्ची टाकण्यात यावा.

अ) संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालयातील कर्मचारी वृंदावरील खर्च (योजनेतर) - मागणी क्र. झेडडी-२, २२०५ कला व संस्कृती, (००) ००१ संचालन व प्रशासन, (०१) (०२) सांस्कृतिक कार्य संचालनालय, (२२०५ १३७४) ०१ वेतन

ब) रंगभवन, रवींद्र नाटय मंदिर व ध्वनीमुद्रित फित संग्रहालयाच्या कर्मचारी वृंदावरील खर्च - मागणी क्र. झेडडी-२, २२०५ कला व संस्कृती, १०२ कला व संस्कृती प्रचालन, (०१) (०१) शासकीय प्रेक्षागृहे व सभागृहे, (२२०५ १७४१) ०१ वेतन

५. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आपुक, दिनांक २२ फेब्रुवारी, २०२२ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०२२०४०४१४४२०५६०२३ असा आहे हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

VILAS RAMRAO THORAT

Digitally signed by VILAS RAMRAO THORAT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e6cc4d20348a52de465c7c34a61591bbe69b747ae11457103a0cfb9a57fc6ce6, pseudonym=2908C178C06A08E995849046F8BCFB7325B57851, serialNumber=CB03C92B399CC89310BF1378C184D97A4B7B9B98E926EA8E71DD7BC9CB273631, cn=VILAS RAMRAO THORAT
Date: 2022.04.05 17:08:05 +05'30'

**( विलास रा. थोरात )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. सचिव ( सां.का. ) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
२. उप सचिव (सां.का.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
३. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, जुने सचिवालय इमारत, पहिला मजला, एम. जी. रोड, मुंबई ४०० ०३२
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई

६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १, महाराष्ट्र राज्य, मुंबई
७. महालेखापाल (लेखापरीक्षा) - १, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८. अवर सचिव, अर्थसंकल्प शाखा, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
९. निवड नस्ती, सां.का.४